**सिंधुदुर्गनगरी नवनगर विकास प्राधिकरणाच्या अखत्यारीतील भूखंड क्र.८३ मधील एकूण १३.३७ हे. आर. क्षेत्रापैकी ८.०० हेक्टर संचालक, एम.एस.एम.ई विकास व सुविधा कार्यालय, मुंबई, सूक्ष्म, लघु व मध्यम उद्यम मंत्रालय, भारत सरकार (एमएसएमई) यांना "तंत्रज्ञान केंद्र"उभारणीकरीता विनामोबदला हस्तांतरित करण्यास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः- एमआरडी-३३२३/प्र.क्र.७०/नवि-७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक:- ०७ ऑगस्ट, २०२३.

**प्रस्तावना:-**

सिंधुदुर्ग जिल्हा मुख्यालयासाठी अधिसूचित करण्यात आलेल्या ४३०.३३ हेक्टर आर. क्षेत्राच्या विकासासाठी दि. ०२/०४/१९९८ रोजी सिंधुदुर्गनगरी नवनगर विकास प्राधिकरणाची स्थापना करण्यात आलेली आहे.

संचालक, सूक्ष्म, लघु व मध्यम उद्यम मंत्रालय (एमएसएमई), भारत सरकार, कुर्ला, मुंबई यांनी दि. १९ जुलै, २०२२ व दि. २० सप्टेंबर, २०२२ रोजीच्या सिंधुदुर्गनगरी नवनगर विकास प्राधिकरणाच्या अखत्यारीतील ८.०० हे. क्षेत्र "तंत्रज्ञान केंद्र" उभारणीसाठी जमीन विनामोबदला उपलब्ध करून देण्याची मागणी प्राधिकरणाकडे केली आहे.

त्यानुसार अध्यक्ष, सिंधुदुर्गनगरी नवनगर विकास प्राधिकरण तथा जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग यांनी दि. २२/११/२०२२ रोजीच्या पत्रान्वये सिंधुदुर्गनगरी नवनगर विकास प्राधिकरणाच्या मंजूर नियोजन प्रस्तावामधील भूखंड क्र.८३ "Orchard" क्षेत्र १३.३७ हे. आर. पैकी ८.०० हेक्टर संचालक, सूक्ष्म, लघु व मध्यम उद्यम मंत्रालय (एमएसएमई), भारत सरकार यांना "तंत्रज्ञान केंद्र" करिता आरक्षित करून देणेकामी व सदरचा भुखंड संचालक, सूक्ष्म, लघु व मध्यम उद्यम मंत्रालय (एमएसएमई), भारत सरकार यांना विनामोबदला हस्तांतरित करणेसाठीचा प्रस्ताव शासनास मंजुरीसाठी सादर केला आहे. त्यानुसार या विभागाकडून सदर भूखंड क्र.८३ "Orchard" क्षेत्र १३.३७ हे. आर. पैकी ८.०० हेक्टर क्षेत्र "तंत्रज्ञान केंद्र" करिता आरक्षित करण्याबाबतची महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६ चे कलम ३७ अन्वयेची फेरबदलाची अधिसूचना दि. ०२/०२/२०२३ रोजी निर्गमित केलेली आहे.

मा. मंत्रीमंडळाच्या दि. २७ जुलै, २०२३ रोजीच्या बैठकीमध्ये सिंधुदुर्गनगरी नवनगर विकास प्राधिकरणाच्या अखत्यारीतील भूखंड क्र.८३ मधील एकूण १३.३७ हे. आर. क्षेत्रापैकी ८.०० हेक्टर संचालक, सूक्ष्म, लघु व मध्यम उद्यम मंत्रालय (एमएसएमई), भारत सरकार यांना "तंत्रज्ञान केंद्र"उभारणीकरीता विनामोबदला हस्तांतरित करण्यास मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

१. केंद्र शासनामार्फत सिंधुदुर्ग येथे नियोजित असलेल्या तंत्रज्ञान केंद्राचा राज्यातील तरूणांची तांत्रिक कौशल्ये वाढवून कुशल मनुष्यबळ निर्माण होण्यास फायदा होणार आहे व त्याचा राज्याच्या विकासावर दुरगामी परिणाम होणार आहे. त्याकरिता सिंधुदुर्गनगरी नवनगर विकास प्राधिकरणाच्या (जमिनीची विल्हेवाट) विनियम, १९९८ मधील प्रकरण सहा (संकीर्ण) अनुच्छेद १५ मधील तरतूद विचारात घेऊन सिंधुदुर्गनगरी

नवनगर विकास प्राधिकरणाच्या अखत्यारीतील भूखंड क्र.८३ मधील एकूण १३.३७ हे. आर. क्षेत्रापैकी ८.०० हेक्टर आर. क्षेत्र सिंधुदुर्गनगरी नवनगर विकास प्राधिकरणाने संचालक, सूक्ष्म, लघु व मध्यम उद्यम मंत्रालय (एमएसएमई), भारत सरकार, कुर्ला, मुंबई यांना "तंत्रज्ञान केंद्र" उभारणीकरीता विनामोबदला हस्तांतरित करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर भुखंड क्र. ८३ मधील ८.०० हे.आर. क्षेत्राचे हस्तांतरण करण्याबाबतची पुढील कार्यवाही अध्यक्ष, सिंधुदुर्गनगरी नवनगर विकास प्राधिकरण यांनी करावी.

३. प्रस्तावित भूखंड क्र. ८३ मधील ८.०० हेक्टर क्षेत्राचे संचालक, सूक्ष्म, लघु व मध्यम उद्यम मंत्रालय (एमएसएमई), भारत सरकार, कुर्ला, मुंबई यांना विनामोबदला हस्तांतरण करण्याच्या संदर्भात सिंधुदूर्गनगरी नवनगर विकास प्राधिकरणास राज्य शासनाकडून कोणतेही आर्थिक सहाय्य अथवा नुकसान भरपाईची मागणी करता येणार नाही.

सदरचा शासन निर्णय वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र.२३१/व्यय-३ दिनांक २७/०६/२०२३ अन्वये प्राप्त अभिप्रायांचा विचार करुन व मा. मंत्रिमंडळाने दि.२७/०७/२०२३ रोजी दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२३०८०७१२१२०९०२२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIJAY KARBHARI CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E1FEEA176A1E6A273C574BB6F1A1EDB58BF87424118BCCD6EE07340581733B70, cn=VIJAY KARBHARI CHAUDHARI
Date: 2023.08.07 15:31:38 +05'30'

**( विजय चौधरी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव.
२) मा.मुख्यमंत्री महोदय यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.उपमुख्यमंत्री महोदय यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) अपर मुख्य सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) प्रधान सचिव, उद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) अध्यक्ष, सिंधुदुर्गनगरी नवनगर विकास प्राधिकरण, सिंधुदुर्ग.
११) जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग.
१२) संचालक, एमएसएमई विकास व सुविधा कार्यालय, एमएसएमई मंत्रालय, भारत सरकार, मुंबई
१३) सह सचिव (नवि-१२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) निवडनस्ती (नवि-७).